**महाराष्ट्र शासन**

अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७,
अल्पसंख्याक विकास विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दि. २७/०३/२०१५

**विषय :- केंद्र पुरस्कृत अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजनेंतर्गत (MsDP) मिल्लत नगर, जालना, जिल्हा जालना येथील शाळा इमारत (स्वच्छतागृहासह) बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**संदर्भ :-**१.अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(२)/२०१३-PP, दि.२९/१०/२०१४
२.जिल्हाधिकारी, जालना यांचे पत्र क्र. २०१५/ अल्प.स./ साप्र/ कावि-दि. १७/०३/२०१५.

**ज्ञापन:-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमांतर्गत (MsDP) गठीत शक्तीप्रदान समितीने दि. ०१/०९/२०१४ रोजीच्या ८९ व्या बैठकीत जालना शहरातील मिल्लत नगर येथील शाळा इमारत बांधकामास (स्वच्छतागृहासह) मान्यता दिली असून, संदर्भाधिन क्र. (१) येथील पत्रान्वये पहिल्या टप्प्यातील निधी वितरित केला आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन जिल्हाधिकारी, जालना यांनी संदर्भाधीन क्र. (२) येथील पत्रान्वये जालना शहरातील मिल्लत नगर येथील शाळा इमारत बांधकामास (स्वच्छतागृहासह) प्रशासकीय मान्यता देण्याच्या दृष्टीने आवश्यक प्रस्ताव ढोबळ अंदाजपत्रकासोबत शासनास सादर केला आहे.

जिल्हाधिकारी, जालना यांनी सादर केलेला मिल्लत नगर, जालना येथील शाळा इमारत बांधकामाचा (स्वच्छतागृहासह) ढोबळ अंदाजपत्रकाचा (बांधकाम सूची दर सन २०१४-१५ नुसार) गोषवारा पुढीलप्रमाणे :-

| अ.क्र. | तपशील | प्रस्तावित रक्कम रुपये | प्रशासकीय मान्यता दयावयाची प्रस्तावित रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | शाळा इमारत बांधकाम | २५,७०,१५३.००/- | २५,७०,१५३.००/- |
| | एकूण | २५,७०,१५३.००/- | २५,७०,१५३.००/- |
| २ | ३% प्रशासकीय खर्च | ७७,१०५.००/- | ७७,१०५.००/- |
| | **एकूण** | **२६,४७,२५८.००/-** | **२६,४७,२५८.००/-** |
| | **से. रु.** | **२६,४८,०००/-** | **२६,४८,०००/-** |

२. जिल्हाधिकारी, जालना यांनी सादर केलेल्या जालना शहरातील मिल्लत नगर येथील शाळा इमारत बांधकामासाठी (स्वच्छतागृहासह) ढोबळ अंदाजपत्रकानुसार एकूण रु.२६,४८,०००/- (रुपये सव्वीस लाख अठ्ठेचाळीस हजार मात्र) इतका खर्च अपेक्षित आहे. त्यानुसार मिल्लत नगर येथील शाळा इमारत बांधकामाच्या

(स्वच्छतागृहासह) एकूण रु.२६,४८,०००/- (रुपये सव्वीस लाख अठ्ठेचाळीस हजार मात्र) इतक्या खर्चाच्या ढोबळ अंदाजपत्रकास याव्दारे पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

१. जिल्हाधिकारी, जालना यांनी मिल्लत नगर येथील प्रस्तावित शाळा इमारत बांधकामाच्या (स्वच्छतागृहासह) आराखडयास व सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेणे त्याचप्रमाणे, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिका-याने मान्यता दिलेल्या बांधकाम आराखडयानुसार व सविस्तर अंदाजपत्रकानुसार शाळा इमारत बांधकामाबाबत (स्वच्छतागृहासह) पुढील कार्यवाही करणे आवश्यक राहील,

२. केद्रशासनाने मान्यता दिल्यानुसार शाळा इमारत बांधकामासाठी (स्वच्छतागृहासह) केंद्र+राज्यहिस्साचे प्रमाण ७५:२५ असे आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी, जालना यांनी मिल्लत नगर येथील शाळा इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे विहित नमुन्यात शासनास सादर करावीत.

३. जिल्हाधिकारी, जालना यांनी मिल्लत नगर येथील शाळा इमारत बांधकामासाठी (स्वच्छतागृहासह) निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करु नये.

४. जिल्हाधिकारी, जालना यांनी मिल्लत नगर, जालना येथील शाळा इमारत बांधकामाची (स्वच्छतागृहासह) सुरुवात सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून करावी. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार प्रस्तावित शाळा इमारत बांधकामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील:-

(रु. कोटीत)

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च | सुरु असलेल्या इतर कामासाठी आवश्यक तरतूद | एकूण मंजूर तरतूद (प्रस्तावित) |
|---|---|---|---|
| २०१५-१६ | ०.१६४८ | ०० | ०.१३२४ |
| २०१६-१७ | ०.१० | ०० | ०.१३२४ |
| **एकूण** | **०.२६४८** | **००** | **०.२६४८** |

३. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००)(१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) (२२३५ ए ५४३) ३१ - सहाय्यक अनुदान" तसेच "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रीय विकास योजना (राज्य हिस्सा) (२२३५ ए २३१) ३१ - सहाय्यक अनुदान" या उद्दिष्टाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१२३५०४९५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 13:11:41 +05'30'

**( सं. सु. गांगुर्डे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई
४. जिल्हाधिकारी, जालना
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जालना
६. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना
७. मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद, जालना
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा जालना
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१०. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
११. निवड नस्ती (का.७)